**महाराष्ट्र राज्यातील सर्व सहकारी दूध संस्था/
संघांना महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम
१९६० चे कलम ७९ अ अन्वये द्यावयाचे निदेश
दूध दर निश्चिती......**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**क्रमांकः एमएलके २०१५/प्र.क्र. ७२ /पदुम ८**
मंत्रालय, मुंबई ४०००३२
तारीख: १० जुलै, २०१५

# निदेश

ज्याअर्थी, शेती व्यवसायासोबत दुग्धव्यवसाय हा राज्यातील शेतकऱ्यांकरीता अत्यंत महत्वाचा जोडधंदा असून त्यासाठी राज्यातील दूधाच्या उत्पादनात बळकटीकरण आणणे, सहकारी दूध संघाच्या कार्यपध्दतीत सुसूत्रता आणणे, दुधाच्या खरेदी दरात दूध उत्पादक शेतकऱ्यांना आर्थिक नुकसान होवू नये त्यासाठी त्यावर आवश्यक उपाययोजना करणे आवश्यक आहे.

ज्याअर्थी, राज्यात पुष्टकाळात दूध उत्पादनात भरीव वाढ होत असते. त्यावेळेस उत्पादित होणाऱ्या दुधावर शेतकऱ्यांना योग्य मोबदला प्राप्त होण्याची गरज आहे. राज्यात दुधाचा व्यवसाय शासन, सहकार व खाजगी यांच्यामार्फत केला जातो. अनुक्रमे याचे प्रमाण सद्य:स्थितीत ३ : ४० : ५७ असे आहे. शासकीय दुधाकरीता शासन परिस्थितीनुरुप शेतकऱ्यांचे हित लक्षात घेवून दुधाचे खरेदी व विक्री दर निश्चित करीत असते. साधारणत: सदर दर ही आधारभूत किंमत म्हणून ग्राहय धरावेत असे शासनास अपेक्षित असते.

ज्याअर्थी, राज्यातील दूध संकलन त्या त्या क्षेत्रामार्फत केले जात असल्याने दूध उत्पादक शेतकऱ्यांना दुधाकरीता प्राप्त होणारा खरेदी दर हा भिन्न भिन्न प्राप्त होतो. राज्यात दूध उत्पादनात वाढ झाल्यास तसेच आंतरराष्ट्रीय बाजारात दूध भुकटीचे दर कोसळलेल्या परिस्थितीत दूध उत्पादक शेतकऱ्यांकडून कमी भावात दुधाची खरेदी केली जाते. याचा एकंदरीत परिणाम दूध उत्पादक शेतकऱ्यांच्या आर्थिक व्यवस्थेवर होतो.

ज्याअर्थी, शेतकऱ्यांचे हित जोपासण्याचे शासनाचे धोरण आहे हे लक्षात घेवून शासन शासकीय दुधाकरीता परिस्थितीनुरुप दुधाचे खरेदी व विक्री दर निश्चित करते. त्यानुसार शेतकरी या घटकाच्या हिताकरीता सहकारी दूध क्षेत्राने त्यांच्याकडे संकलित होणाऱ्या दुधासाठी शेतकऱ्यांना किमान शासनाने निश्चित केलेले खरेदी दर देणे आवश्यक आहे. मात्र त्याप्रमाणे सहकार क्षेत्राकडून कार्यवाही केली जात नसल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे. परिणामी चालू वर्षी तोटा सहन करुन शेतकऱ्यांच्या हिताकरीता सहकारी दूध संघांकडील अतिरिक्त दुधाची खरेदी शासनाने शासकीय दराने केलेली आहे. मुळात हे नियोजन एकत्रित उपाययोजनेचा भाग असून सहकारी दूध संघानी शासकीय दराने दूध खरेदी दर शेतकऱ्यांना देणे अपेक्षित होते.

ज्याअर्थी, अतिरिक्त दूध उत्पादनाच्या काळात काही सहकारी दूध संघ शासनाने ठरवून दिलेल्या खरेदी दरापेक्षा कमी दर दूध उत्पादक शेतकऱ्यांना देत असतात हे लक्षात घेता, याप्रकरणी महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० च्या कलम ७९ अ अन्वये लोकहितास्तव शासनाने निदेश देण्याची आवश्यकता आहे.

त्याअर्थी, महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० च्या कलम ७९ अ नुसार पुढील प्रमाणे निदेश देत आहे :-

राज्य शासन शासकीय दुधाच्या खरेदी - विक्रीचे दर परिस्थितीनुरुप वेळोवेळी शासन निर्णयान्वये निश्चित करीत असते. सदर दर निश्चित करताना सर्व घटकांचे हित लक्षात घेण्यात येते. सदर वस्तुस्थिती लक्षात घेता, शासनाने निश्चित केलेल्या दूध खरेदीचे दर (वरकड खर्चासह ) हा प्रमाणक दर समजून राज्यातील सहकारी दूध संस्था /संघानी दूध उत्पादक शेतकऱ्यांना हाच दूध खरेदी दर वेळोवेळी निर्गमित होणाऱ्या शासन निर्णयाच्या दिनांकापासून देणे आवश्यक असून त्याप्रमाणे कार्यवाही न केल्यास उपरोक्त अधिनियमातील तरतूदीचा भंग केल्याचे समजण्यात येईल.

सदर शासन निदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७१०१६४८१८२२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahesh Dinkar Pathak

Digitally signed by Mahesh Dinkar Pathak
DN: c=IN, o=All India Service, ou=Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Mahesh Dinkar Pathak
Date: 2015.07.10 16:55:35 +05'30'

**(महेश पाठक)**
सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) मा.मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव
३) मा.राज्यमंत्री(पदुम) यांचे खाजगी सचिव
४) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
५) आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई
६) सहनिबंधक, सहकारी संस्था (दुग्ध)/ सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था
७) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ म., गोरेगाव, मुंबई (सर्व सहकारी दूध संस्था/ संघ यांना त्यांच्यास्तरावरुन निदर्शनास आणण्याच्या विनंतीसह..)
८) सर्व प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी
९) सर्व जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी
१०) निवडनस्ती